संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक यांच्या आस्थापनेवर पोलीस निरीक्षकांची १० पदे स्थानांतरणाने उपलब्ध करुन देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अेपीओ-०२१५/प्र.क्र.२६२/पोल-३**
मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई
दिनांक : ०७ जूलै, २०१७.

**वाचा :-**

१) गृह विभाग शासन निर्णय क्रमांकः टीईएक्स-०३९६/सी.आर.१३/पोल-५अ,दि.२६.०४.१९९७.
२) गृह विभाग शासन निर्णय क्रमांकः अेपीओ-३१०८/६९७/प्र.क्र.२८४/पोल-३, दि.०७.०८.२००८.
३) गृह विभाग शासन निर्णय क्रमांकः अेपीओ-३१०९/८३६/प्र.क्र.३४०/पोल-३,दि.३१.१२.२००९.
४) गृह विभाग शासन निर्णय क्रमांक अेपीओ-३१११/प्र.क्र.१०७(अ)/पु.बां.२/पोल-३,दि.०४.०३.२०१४.
५) वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०१५/प्र.क्र.४१/अर्थ-१,दि.०२.०६.२०१५.
६) गृह विभाग शासन निर्णय क्रमांक अेपीओ-३६१६/प्र.क्र.१५८/पोल-३, दि.०५.०१.२०१७.
७) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य,मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/२६-ब/म.पो.अ./नाशिक/१० पो.नि. पदे/३६/२०१४ दि.०६.०४.२०१७.
८) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य,मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/२६-ब/म.पो.अ./नाशिक/१० पो.नि. पदे/३६/२०१४ दि.०९.०६.२०१७.

**प्रस्तावना :-**

वित्त विभागाने उपरोक्त संदर्भाधिन क्र.०५ येथील नमूद दिनांक ०२.०६.२०१५ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागाला प्रशासनावर कोणताही विपरीत परिणाम न होता, विभागामध्ये एकुण उपलब्ध कर्मचाऱ्याचे समायोजन करण्याचे संपुर्ण अधिकार दिले आहेत. विभागाच्या ज्या संवर्गाच्या बाबतीत कामांची आवश्यकता कमी झाली आहे, अशा संवर्गातील पदांची विभागातील तीच वेतनश्रेणी असलेल्या दुसऱ्या संवर्गात आवश्यकतेनुसार पदे स्थानांतरण करण्यात येतील. तथापि त्या विभागातंर्गत एकुण पद संख्येच्या मर्यादेतच असे समायोजन राहील, अशी तरतुद केली आहे. त्यानुषंगाने संदर्भाधिन क्र.०६ येथील नमूद दिनांक ०५.०१.२०१७ च्या शासन निर्णयान्वये राज्यातील ३२ जिल्ह्यांतील आर्थिक गुन्हे शाखेकरीता इतर घटक कार्यालयांसाठी मंजूर करण्यात आलेली पोलीस उपअधीक्षक/सहायक पोलीस आयुक्तांची पदे स्थानांतरणाने उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात आली आहे. सदर शासन निर्णयान्वये संचालक, महाराष्ट्र पोलीस

अकादमी यांच्या आस्थापनेवर मंजूर असलेली पोलीस उपअधीक्षक/सहायक पोलीस आयुक्तांची १० पदे इतर घटक कार्यालयांच्या आस्थापनेवर स्थानांतरणीत करण्यात आली आहेत. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी उपरोक्त संदर्भाधिन क्र.०७ व ०८ येथे नमूद अनुक्रमे दिनांक ०६.०४.२०१७ व दिनांक ०९.०६.२०१७ च्या पत्रान्वये उक्त पोलीस उपअधीक्षक/सहायक पोलीस आयुक्तांच्या १० पदांच्या बदल्यात १) पोलीस प्रशिक्षण केंद्र, खंडाळा २) पोलीस प्रशिक्षण केंद्र, नागपूर ३) पोलीस प्रशिक्षण केंद्र, जालना ४) पोलीस प्रशिक्षण केंद्र, बाभळगांव, लातूर ५) पोलीस प्रशिक्षण केंद्र, मरोळ ६) पोलीस आयुक्त, नाशिक शहर यांच्या आस्थापनेवर मंजूर असलेली पोलीस निरीक्षकांची एकुण १० पदे संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक यांच्या आस्थापनेवर स्थानांतरणाने उपलब्ध करुन देण्याची शासनास विनंती केली आहे. सदर विनंतीच्या अनुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

१) पोलीस प्रशिक्षण केंद्र, खंडाळा २) पोलीस प्रशिक्षण केंद्र, नागपूर ३) पोलीस प्रशिक्षण केंद्र, जालना ४) पोलीस प्रशिक्षण केंद्र, बाभळगांव, लातूर ५) पोलीस प्रशिक्षण केंद्र, मरोळ ६) पोलीस आयुक्त, नाशिक शहर या कार्यालयांसाठी मंजुर करण्यात आलेल्या मनुष्यबळामधून खालील तक्यात नमूद पोलीस निरीक्षकांची एकुण १० पदे संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक यांच्या आस्थापनेवर स्थानांतरण करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | घटक कार्यालयाचे नाव | म.पो.अ., नाशिक येथे स्थानांतरण करावयाची पोलीस निरीक्षकांची पदसंख्या | पदनिर्माती केलेल्या शासन निर्णयाचा क्रमांक व दिनांक |
|---|---|---|---|
| १. | पोलीस प्रशिक्षण केंद्र, खंडाळा | ०१ | गृह विभाग शासन निर्णय क्र.टीईएक्स-०३९६/ सीआर-१३/ पोल-५अ, दि.२६.०४.१९९७ |
| २. | पोलीस प्रशिक्षण केंद्र, नागपूर | ०१ | गृह विभाग शासन निर्णय क्र.अेपीओ-३१०८/ ६९७/प्र.क्र.२८४/पोल-३, दि.०७.०८.२००८ |
| ३. | पोलीस प्रशिक्षण केंद्र, जालना | ०१ | गृह विभाग शासन निर्णय क्र.अेपीओ-३१०८/ ६९७/प्र.क्र.२८४/पोल-३, दि.०७.०८.२००८ |

| अ.क्र. | घटक कार्यालयाचे नाव | म.पो.अ., नाशिक येथे स्थानांतरण करावयाची पोलीस निरीक्षकांची पदसंख्या | पदनिर्माती केलेल्या शासन निर्णयाचा क्रमांक व दिनांक |
|---|---|---|---|
| ४. | पोलीस प्रशिक्षण केंद्र, बाभळगांव, लातूर | ०२ | गृह विभाग शासन निर्णय क्र.अेपीओ-३१०९/८३६/प्र.क्र.३४०/पोल-३, दि.३१.१२.२००९ |
| ५. | पोलीस प्रशिक्षण केंद्र, मरोळ | ०२ | गृह विभाग शासन निर्णय क्र.अेपीओ-३१०८/६९७/प्र.क्र.२८४/पोल-३, दि.०७.०८.२००८ |
| ६. | पोलीस आयुक्त, नाशिक शहर | ०३<br>(नक्षल विरोधी कक्ष- ०१ पद व वाहतुक शाखा-०२ पदे) | गृह विभाग शासन निर्णय क्र.अेपीओ-३१११/१०७(अ)/पु.बां.२/पोल-३, दिनांक ०४.०३.२०१४ |
| **एकूण** | | **१०** | |

२. सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१५/प्र.क्र.४१/अर्थ-१, दि.०२.०६.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७०७१२५०५२६५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dhiraj K Abhang

Digitally signed by Dhiraj K Abhang
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b83edfcbaa0fddb5983e8303bccd9a96ef7cc55853b8b449ff8dc53d69f1618d, cn=Dhiraj K Abhang
Date: 2017.07.07 12:50:16 +05'30'

**( धीरज कां. अभंग )**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२. मा.राज्यमंत्री, गृह (शहरे) यांचे खाजगी सचिव.
३. मा.राज्यमंत्री, गृह (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव.
४. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

६. प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक.
८. पोलीस आयुक्त, नाशिक शहर.
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), १/२, मुंबई/नागपूर.
१०.प्राचार्य, पोलीस प्रशिक्षण केंद्र, खंडाळा/नागपूर/जालना/बाभळगांव, लातूर/मरोळ.
११.अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई.
१२.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर/जालना/लातूर/मुंबई/नाशिक.
१३.निवासी लेखा परीक्षा अधिकारी,वांद्रे,मुंबई.
१४. कार्यासन अधिकारी, व्यय-७, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५.निवड नस्ती, पोल-३.